स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत नागरी घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.
नागपूर महानगर पालिका, जिल्हा नागपूर.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- स्वमअ-२०२०/प्र.क्र.१७(९)/नवि-३४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ३० जानेवारी, २०२०

वाचा:-

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: स्वभाअ-२०१५/प्र. क्र. २३/नवि-३४, दि. १५ मे, २०१५
२. स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत गठीत उच्चाधिकार समितीच्या दिनांक ३०.८.२०१९ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**शासन निर्णय :-**

नागपूर महानगर पालिकेचा घनकचरा व्यवस्थापनाचा रू ३०७,८१,००,०००/- (रूपये तीनशे सात कोटी एक्याऐंशी लक्ष फक्त) भांडवली किंमतीच्या घनकचऱ्यापासून उर्जा निर्मिती प्रकल्पासह अन्य उपांगांचा समावेश असलेल्या नागरी घनकचरा व्यवस्थापनाच्या प्रकल्पास मंजुरी देण्यात आली होती. यापैकी स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत रु. २८७,३४,००,०००/- (रूपये दोनशे सत्त्याऐंशी कोटी चौतीस लक्ष फक्त) इतक्या किंमतीचा प्रकल्प अनुज्ञेय आहे.

२. सदर प्रकल्पा अंतर्गत नागपूर शहरात निर्माण होणाऱ्या घनकचऱ्यापासून ऊर्जा निर्मितीच्या (Waste to Energy) प्रकल्पास मंजूरी देण्यात आली होती. त्या अनुषंगाने नागपूर महानगर पालिकेने कचऱ्यापासून ऊर्जा निर्मितीचा प्रकल्प राबविण्याचा प्रयत्न केला होता. परंतु, सदर प्रकल्प व्यवहार्य नसल्याचे लक्षात आल्याने ऊर्जा निर्मितीच्या (Waste to Energy) प्रकल्पासह एकूण रु. २,८७,१६,००,०००/- (रूपये दोनशे सत्याऐंशी कोटी सोळा लक्ष फक्त) किंमतीच्या बाबी रद्द करून त्या ऐवजी रु. २४५,९८,००,०००/- (रूपये दोनशे पंचेचाळीस कोटी अठ्याण्णव लक्ष फक्त) किंमतीच्या बाबी अंतर्भूत करून एकूण रु. २६६,६३,००,०००/- (रूपये दोनशे सहासष्ट कोटी त्रेसष्ट लक्ष फक्त) किंमतीचा घनकचरा व्यवस्थापन प्रकल्प उभारण्यासाठी सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती नागपूर महानगरपालिकेनी केली आहे.

३. यानुसार, नागपूर महानगर पालिकेने रु. २४५,९८,००,०००/- (रूपये दोनशे पंचेचाळीस कोटी अठ्याण्णव लक्ष फक्त) किंमतीच्या बाबी नव्याने अंतर्भूत करण्यासाठी सुधारित प्रस्ताव संचलनालयाकडे सादर केला आहे.

४. सदर प्रस्तावाची छाननी राज्य अभियान संचालनालायच्या स्तरावर करून त्यास राज्यस्तरीय तांत्रिक समितीने मान्यता दिल्यावर सदर प्रस्ताव दिनांक ३०/०८/२०१९ रोजी झालेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीत ठेवण्यात आला होता. सदर बैठकीत उच्चाधिकार समितीने नागपूर महानगर पालिकेच्या सुधारित प्रकल्प अहवालास मान्यता प्रदान केली आहे.

५. नागपूर महानगरपालिकेच्या घनकचरा व्यवस्थापनाच्या या शासन निर्णया सोबतच्या विवरणपत्रातील रकाना क्रमांक २ व ३ मध्ये दर्शविल्यानुसार मूळ रू ३०७,८१,००,०००/- (रूपये तीनशे सात कोटी एक्याऐंशी लक्ष फक्त) भांडवली किंमतीच्या प्रकल्प अहवालापैकी, या शासन निर्णया सोबतच्या विवरणपत्रातील रकाना क्रमांक ४ व रकाना क्रमांक ५ मध्ये दर्शविलेल्या रु. २८७,१६,००,०००/- (रूपये दोनशे सत्याऐंशी कोटी सोळा लक्ष फक्त) किंमतीच्या बाबी वगळण्यास व या शासन निर्णया सोबतच्या विविरणपत्रातील रकाना क्रमांक ६ व रकाना क्रमांक ७ मध्ये दर्शविलेल्या रु. २४५,९८,००,०००/- (रूपये दोनशे पंचेचाळीस कोटी अठ्याण्णव लक्ष फक्त) किंमतीच्या बाबी या शासन निर्णयातील परिच्छेद ८ मध्ये नमूद अटी व शर्तीच्या अधीन मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे.

६. सदरच्या बदलामुळे नागपूर महानगरपालिकेच्या सविस्तर प्रकल्प अहवालाची सुधारित किंमत रु. २६६,६३,००,०००/- (रूपये दोनशे सहासष्ट कोटी त्रेसष्ट लक्ष फक्त) एवढी राहील. तसेच, वित्तीय आकृतीबंध पुढील तक्त्यात नमुद केल्याप्रमाणे राहील.

(किंमत रु. कोटीमध्ये)

| स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत अनुज्ञेय किंमत | प्रकल्पाची मंजूर सुधारित किंमत | केंद्र शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (मंजूर प्रकल्प किंमतीच्या ३५%) | राज्याचा अनुज्ञेय हिस्सा (केंद्राच्या हिश्याच्या ६०:४० या प्रमाणात) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (केंद्र व राज्य शासनामार्फत मंजूर अनुदाना व्यतिरिक्त) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| २८७.३४ | २६६.६३ | ९३.३२ | ६२.२१ | १११.१० |

**<u>७. निधी वितरणाची कार्यपध्दती</u>** :

७.१ केंद्र शासन पुरस्कृत स्वच्छ भारत अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार केंद्र व राज्य शासनाचा वितरीत केला जाईल.

७.२ सदर प्रकल्पासाठी निधी वितरीत करताना दिलेल्या सूचनांनुसार, सदर प्रकल्पासाठी प्राप्त निधी शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहीत केलेल्या बँकांमध्ये, स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.

७.३ सदर प्रकल्पासाठी वितरीत केलेला निधी त्याच प्रकल्पासाठी वापरणे बंधनकारक असून त्याचा वापर इतर प्रयोजनार्थ केल्यास सदर बाब ही गंभीर वित्तिय अनियमितता समजण्यात येईल.

७.४ राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था/कार्यान्वयन यंत्रणेची राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध करून दिले जाणार नाही.

७.५ स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत मंजूर घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदाना व्यतिरिक्त उर्वरित निधी (उपरोक्त तक्त्यातील रकाना ५ नुसार) संबंधित नागरी स्थानिक स्वराज संस्थेने उभारून केंद्र व राज्य हिश्याच्या प्रमाणात खर्च करणे आवश्यक राहील.

७.६ स्वच्छ महाराष्ट्र अभियानाच्या वित्तिय आकृतीबंधानुसार केंद्र व राज्य शासनाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज संस्थेने स्व:हिश्याचा निधी उभारून, सदर एकत्रित खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात सादर करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज संस्थेवर बंधनकारक असणार आहे.

७.७ सदर प्रकल्पासाठी उपलब्ध करून दिलेल्या केंद्र व राज्य शासनाच्या हिश्श्याच्या प्रथम हप्त्याचा निधीचे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र राज्य शासनास सादर केल्यानंतर दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

<u>८.अटी व शर्ती</u>:

८.१ सदर प्रकल्पासाठी कार्यान्वयन यंत्रणा नागपूर महानगर पालिका राहील.

८.२ केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना व राज्य शासनाच्या संदर्भाधीन क्रमांक १ चा शासन निर्णय व घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१६ नुसार सदर प्रकल्पाची अंमलबजावणी विहित कालावधीमध्ये करणे, कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

८.३ या प्रकल्प अहवालाची यशस्वीता ही घनकचऱ्याचे निर्मितीच्या जागीच विलगीकरण करण्यावर आधारित आहेत. त्यामुळे शहरात निर्माण होणाऱ्या १००% घनकचऱ्याचे निर्मीतीच्या जागीच विलगीकरण करून, तो कचरा वेगवेगळा संकलीत करणे अत्यावश्यक राहील. त्यानुसार, नागपूर महानगर पालिकेने जून, २०२० पर्यंत शहरात दररोज निर्माण होणाऱ्या घनकचऱ्यापैकी किमान ९०% घनकचऱा निर्मितीच्या जागीच विलगीकरण करून संकलीत करणे बंधनकारक राहील.

८.४ या विलगीकरण केलेल्या ओल्या कचऱ्यावर प्रक्रीया सुरू करणे बंधनकारक राहील.

८.५ या विलगीकरण केलेल्या कचऱ्याची वाहतूक व त्यावर करावयाची शास्त्रोक्त प्रक्रीया या बाबीची सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये समाविष्ट बाबींची विहित कालावधीमध्ये अंमलबजावणी करण्याची जबाबदारी कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

८.६ घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालात नमूद उपकरणे/मशीन/यंत्रे इत्यादी ची खरेदी Government eMarketplace (GeM) पोर्टल वरूनच करणे बंधनकारक राहील. याशिवाय इतर पद्धतीचा अवलंब करून खरेदी केल्यास, ती आर्थिक अनियमितता समजून शासनामार्फत पुढील उचित कार्यवाही करण्यात येईल.

८.७ सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करताना पुढील १० वर्षाची आवश्यकता विचारात घेवून तयार केलेला आहे. या प्रकल्प अहवालाची अंमलबजावणी सुरू करताना सध्याची आवश्यकता विचारात घेवूनच आवश्यक खरेदी व बांधकामे करण्यात यावीत.

८.८ प्रकल्पाचे काम सुरु झाल्यानंतर सक्षम प्राधिकाऱ्याने कामाची गुणवत्ता व देयके प्रमाणित केल्यानंतर उपलब्ध निधीच्या मर्यादेत कामाची देयके १५ दिवसांत संबंधित कंत्राटदारास देण्याची जबाबदारी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था/कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

८.९ घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पाच्या देखभाल दुरुस्ती खर्चासाठी आवश्यक ती यंत्रणा संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेने विकसित करावी व त्याद्वारे सदर प्रकल्पासाठीचा देखभाल व दुरुस्तीचा खर्च भागविण्यात यावा.

९. स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत नागपूर महानगर पालिकेच्या घनकचरा व्यवस्थापनासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात येत असलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालाची अंमलबजावणी करताना पुढील प्रमाणे निश्चित केलेले उद्दिष्ट पूर्ण करणे (Outcome base) कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.:-

- शहरात निर्माण होणाऱ्या घनकचऱ्याचे निर्मितीच्या जागी १००% विलगीकरण (at Source Segregation) करणे.
- विलगीकरण केलेल्या १००% कचऱ्याची विलगीकृत पध्दतीने वाहतूक करणे.
- ओल्या कचऱ्यापासून कंपोस्ट खत निर्मिती करणे अथवा त्यावर बायोमिथेनायझेशन पध्दतीने प्रकिया करणे.
- खत निर्मिती करण्यात येत असेल तर, ओल्या कचऱ्यापासून निर्माण केलेल्या सेंद्रिय खताची FCO मानकानुसार राज्य शासनाने प्राधिकृत केलेल्या प्रयोगशाळेमधून तपासणी करून घेवून त्यास “हरित महासिटी कंपोस्ट” हा ब्रँड मिळविणे. तसेच या सेंद्रिय खताची “हरित महासिटी कंपोस्ट” या नावाने विक्री करणे.
- सुक्या कचऱ्याचे पदार्थ पुनर्प्राप्ती सुविधा केंद्रावर (Material Recovery Facility) दुय्यम विलगीकरण (Secondary Segregation) करावे. यापैकी पुनर्वापर होऊ शकणाऱ्या सुक्या कचऱ्याचा पुनर्वापर करावा अथवा शक्य असल्यास त्याची विक्री करावी.
- उपरोक्त सर्व प्रक्रीयांनंतर शिल्लक राहणाऱ्या उर्वरित कचऱ्याची भराव भूमीवर विल्हेवाट लावणे बंधनकारक राहील.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१३०१७३३१६९९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ajit Sahebrao Palwe

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bcc5dbdaa52955626b8257f1105a8a62ddbd1337948a428b4e4c992e5d3bf423, cn=Ajit Sahebrao Palwe
Date: 2020.02.17 11:29:48 +05'30'

( अजित पालवे )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव,
३. मा. राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव
४. प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक
६. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८. आयुक्त, नागपूर महानगर पालिका
९. आयुक्त तथा संचालक, महानगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.

१०. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान संचालनालय, मुंबई.
११. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
१२. जिल्हाधिकारी, नागपूर.
१३. जिल्हा प्रशासन अधिकारी, नागपूर.
१४. निवडनस्ती, नवि-३४.

# विवरणपत्र

(शासन निर्णय क्रमांक:- स्वमअ-२०२०/प्र.क्र.१७(९)/नवि-३४ दिनांक: ३० जानेवारी, २०२० सोबतचे विवरणपत्र)

(किंमत रु. कोटीत)

| अनु. क्र. | मूळ प्रकल्प अहवालातील बाबी | | मूळ प्रकल्प अहवलातून वगळावयाच्या बाबी | | नव्याने मंजूर करावयाच्या बाबी | | सुधारित सविस्तर प्रकल्प अहवालातील बाबी | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | बाबी | किंमत | बाबी | किंमत | बाबी | किंमत | बाबी | किंमत |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) |
| Primary Storage and Collection | | | | | | | | |
| 1 | Litter Bins (200 Ltrs) 1200 nos | 3 | Litter Bins (200 Ltrs) 1200 nos | 3 | Litter Bins (200 Ltrs) 1000 nos | 1.25 | Litter Bins (200 Ltrs) 1000 nos | 1.25 |
| 2 | Litter Bins (120 Ltrs.) 120 nos | 0.75 | Litter Bins (120 Ltrs.) 120 nos | 0.75 | | | | |
| 3 | Garbage Bins (240 Ltrs) 250 nos | 0.2 | Garbage Bins (240 Ltrs) 250 nos | 0.2 | | | | |
| 4 | Secondary Storage Containers | 1.68 | Secondary Storage Containers | 1.68 | | | | |
| | Street Sweeping | | Street Sweeping | | A) Primary Collection Vehicles | | A) Primary Collection Vehicles | |
| 5 | Mechanical Sweepers for road sweeping (06 Nos.) | 9.6 | Mechanical Sweepers for road sweeping (06 Nos.) | 9.6 | | | | |
| 6 | Wheel barrows for collection of street sweeping waste (1000 Nos.) | 7.44 | Wheel barrows for collection of street sweeping waste (1000 Nos.) | 7.44 | E-Rickshaw, 300 nos. | 6.54 | E-Rickshaw, 300 nos. | 6.54 |
| 7 | Hand Carts 1000 nos | | Hand Carts 1000 nos | | E-rickshaw Charging Station | 3 | E-rickshaw Charging Station | 3 |
| 8 | Backhoe Loader 6 Nos. | | Backhoe Loader 6 Nos. | | LCV, 390 Nos. | 31.85 | LCV, 390 Nos. | 31.85 |
| 9 | Tippers, 7 Nos. | | Tippers, 7 Nos. | | B) Secondary Collection & Transportation | | B) Secondary Collection & Transportation | |
| 10 | Pocklean, 2 Nos. | | Pocklean, 2 Nos. | | Hook Loader with 25t GVW chassis, 15 Nos. | 9.24 | Hook Loader with 25t GVW chassis, 15 Nos. | 9.24 |
| 11 | Skid Steer Loader (Robot) | | Skid Steer Loader (Robot) | | Container, 16 Cum, 22 Nos. | 3.28 | Container, 16 Cum, 22 Nos. | 3.28 |
| 12 | Environmental Compliance Cost | 0.19 | Environmental Compliance Cost | 0.19 | Refuse Compactors, Cap. 5 to 6 Cum, 15 Nos. | 4.5 | Refuse Compactors, Cap. 5 to 6 Cum, 15 Nos. | 4.5 |
| 13 | Waste to Energy, 1 Unit | 241.12 | Waste to Energy, 1 Unit | 241.12 | Refuse Compactors, Cap. 8 to 10 Cum, 15 Nos. | 5.35 | Refuse Compactors, Cap. 8 to 10 Cum, 15 Nos. | 5.35 |

| अनु. क्र. | मूळ प्रकल्प अहवालातील बाबी | | मूळ प्रकल्प अहवलातून वगळावयाच्या बाबी | | नव्याने मंजूर करावयाच्या बाबी | | सुधारित सविस्तर प्रकल्प अहवालातील बाबी | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | बाबी | किंमत | बाबी | किंमत | बाबी | किंमत | बाबी | किंमत |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) |
| 14 | Reallocation of existing Waste | 18.83 | Reallocation of existing Waste | 18.83 | C) Transfer Station with Hoppers, Static Compactors etc., 10 Nos. | 60 | C) Transfer Station with Hoppers, Static Compactors etc., 10 Nos. | 60 |
| 15 | C&D -1 Unit | 21 | C&D -1 Unit | 4.35 | - | - | C&D -1 Unit | 16.65 |
| 16 | Incineration plant for dead animals, 1 unit | 3.5 | - | - | - | - | Incineration plant for dead animals, 1 unit | 3.5 |
| 17 | Information, Education & Communication (IEC) | 0.5 | - | - | Information, Education & Communication (IEC) | 4.5 | Information, Education & Communication (IEC) | 5 |
| 18 | | | | | D) Common Set Up | | D) Common Set Up | |
| 19 | - | - | - | - | Tippers, 12 Nos. | 3 | Tippers, 12 Nos. | 3 |
| 20 | - | - | - | - | Backhoe, 10 Nos. | 2.5 | Backhoe, 10 Nos. | 2.5 |
| 21 | - | - | - | - | Supervisor Vehicle, 6 Nos. | 0.6 | Supervisor Vehicle, 6 Nos. | 0.6 |
| 22 | - | - | - | - | LCV with Water Container for Bin Cleaning, 5Nos. | 0.37 | LCV with Water Container for Bin Cleaning, 5Nos. | 0.37 |
| 23 | - | - | - | - | ICT for total C&T | 10 | ICT for total C&T | 10 |
| 24 | - | - | - | - | ICT for existing Infrastructure | 1 | ICT for existing Infrastructure | 1 |
| 25 | - | - | - | - | Mechanical Workshop 1.0 No. | 3 | Mechanical Workshop 1.0 No. | 3 |
| 26 | - | - | - | - | 1 Composting Plant @200 MTPD | 6 | 1 Composting Plant @200 MTPD | 6 |
| 27 | - | - | - | - | Bio CNG 100 MTPD - 3 Nos. | 75 | Bio CNG 100 MTPD - 3 Nos. | 75 |
| 28 | - | - | - | - | Decentralized MRF - 20 Nos. | 3 | Decentralized MRF - 20 Nos. | 3 |

| अनु. क्र. | मूळ प्रकल्प अहवालातील बाबी | | मूळ प्रकल्प अहवलातून वगळावयाच्या बाबी | | नव्याने मंजूर करावयाच्या बाबी | | सुधारित सविस्तर प्रकल्प अहवालातील बाबी | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | बाबी | किंमत | बाबी | किंमत | बाबी | किंमत | बाबी | किंमत |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) |
| 29 | - | - | - | - | RDF plant | 6 | RDF plant | 6 |
| 30 | - | - | - | - | 1 no. Green Waste Processor - 20 nos. | 6 | 1 no. Green Waste Processor - 20 nos. | 6 |
| | **307.81** | | **287.16** | | **245.98** | | **266.63** | |